**संरक्षण दलातील सैन्य भरती प्रवेश प्रक्रियेवरील अनुदानात वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१६/प्र.क्र. २७६/२८**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख : ०७.०३. २०१७.

वाचा :

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण २००२/१८/ प्र. क्र. ३५/२००२/२८, दि. २०/०८/२००३.

२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : सैभमे २०१२/११३४/ (प्र.क्र. ३९९/१२)२८, दि. १३/०९/२०१२.

३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : पुरवणी २०१३/(प्र.क्र.२११/१३/२८, दि. ०४/०१/२०१४.

४) मुख्यालय क्षेत्रिय भरती कार्यालय, पुणे यांचे पत्र क्रमांक D/७१६/AHQ/Corr, दि. २४/०८/२०१६

५) संचालक, सैनिक कल्याण विभाग पुणे यांचे पत्र क्र. १९००६/ सै भ मेळावा/ सैकावि-१९/३९१५, २८/०९/२०१६.

प्रस्तावना :

दरवर्षी संरक्षण दलामार्फत राज्यात सैन्यभरती करण्यासाठी ठिकठिकाणी सैन्य भरती मेळावे आयोजित करण्यात येतात. या प्रत्येक मेळाव्यासाठी संरक्षण मंत्रालयाच्या भरती कार्यालयामार्फत अंदाजे १२ ते १४ अधिकारी व ३५ ते ४० जेसीओ/ ओआरचे पथक असते. भरती प्रक्रियेचा कालावधी ५ ते ७ दिवसांचा असतो. सैन्यभरतीबाबत केंद्र शासनाने एप्रिल १९९८ पासून नवीन कार्यपध्दती अवलंबिली असून त्यानुसार भरती मेळाव्याचा प्रसार होण्यासाठी निरनिराळया ठिकाणी भरती मेळावे आयोजित करण्यात येतात. यासाठी विभागीय भरती कार्यालयांमार्फत स्थानिक वर्तमानपत्रांद्वारे प्रसिध्दी देण्यात येते. हे भरती मेळावे यशस्वी करण्यास नागरी प्रशासनाचे सहकार्य मिळावे म्हणून शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसओपी २०१२/७५/(प्र.क्र.१८७/१२)२८, दिनांक २५/०६/२०१२ अन्वये सर्व संबंधित प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांना आवश्यक त्या सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्याच्या सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. यापूर्वी सदर मेळाव्यांवर होणाऱ्या खर्चासाठी प्रति मेळावा रुपये ३.००/- लक्ष याप्रमाणे प्रतीवर्षी वर्षभरात १० मेळाव्यांसाठी एकूण रुपये ३०.०० लक्षची तरतूद शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : **पुरवणी २०१३**/(प्र.क्र.**२११/१३**)२८,दि. **०४/०१/२०१४ अन्वये** करण्यात येत होती. तथापि, आजची महागाईची परिस्थिती विचारात घेता प्रत्येक बाबींसाठी खर्चात झालेल्या अवाजवी वाढीमुळे इतक्या कमी खर्चात मेळावे आयोजित करणे जिकरीचे होत होते. वरील प्रयोजनार्थ लागणाऱ्या अन्य आवश्यक बाबींची तरतूद करण्यासाठी समाजातील प्रतिष्ठीत व्यक्ती, शासकीय, निमशासकीय कार्यालये, मंडळे, महामंडळे यांचेकडून मिळणारी मदतही अपूरी पडत असे मुख्यायल भरती कार्यालय, पुणे यांनी नवीन नियमाप्रमाणे महाराष्ट्रातील मुंबई, औरंगाबाद, नागपूर, कोल्हापूर व भरती कार्यालय पुणे अशी पाच सैन्य भरती कार्यालये वर्षातून प्रत्येकी एकच सैन्य भरती कार्यक्रम राबवितील अशा सूचना दिल्या आहेत. या अनुषंगाने दिनांक २८/०९/२०१६ रोजी संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार प्रती मेळावा

रुपये ६.०० लक्ष याप्रमाणे ५ मेळाव्या करीता प्रतीवर्षी रुपये ३०.०० लक्ष इतके अनुदान देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत सर्वकष विचार करुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

राज्यातील संरक्षण दलातील सैन्य भरती प्रवेश प्रक्रियेवरील , एकंदरीत झालेल्या दरवाढीच्या प्राश्वभूमीवर सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून प्रती मेळावा रुपये ६.०० लक्ष ( रुपये सहा लक्ष फक्त) या प्रमाणे ( २० दिवसांचा कालावधी) वर्षभरात एकूण ५ मेळाव्याकरीता प्रतीवर्षी एकूण रुपये ३०.०० लक्ष ( रुपये तीस लक्ष फक्त) इतक्या रकमेची तरतूद करण्यास शासन मंजूरी देत आहे. तसेच "भविष्यात सध्याच्या १० मेळाव्यांच्या ऐवजी पुन्हा १० मेळाव्यासाठी प्रत्येकी रुपये ६.०० लक्ष या प्रमाणे निधीची मागणी करण्यात येणार नाही" या अटीच्या अधिन राहून वर्षभरात ५ मेळाव्याकरीता प्रती वर्षी रुपये ३०.०० लक्ष यापमाणे प्रस्तावास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर अनुदान " मागणी क्रमांक ए-५ लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण , ६० इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २०० इतर कार्यक्रम (००)(१०) संरक्षण दलामधील सैन्यभरती प्रवेश प्रक्रियेवरील खर्च (योजनेत्तर ) (२२३५-३०९७) -५० इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांना याबाबतीत "आहरण व संवितरण" अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं-७६१/१६/ व्यय-४, दिनांक ६/०१/२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०९१७१२०६८९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d92842418782eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55d1, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2017.03.09 17:12:47 +05'30'

**(कि. म. जकाते)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा. मंत्री ( मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,
४. मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक ,
५. सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

८. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई - ३२,

९. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

१०. सर्व जिल्हाधिकारी,

११. सर्व कोषागार अधिकारी,

१२. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००५१ (५ प्रती),

१३. सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,

१४. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई ३२,

१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

१६. वित्त विभाग (व्यय ४),मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१७. सामान्य प्रशासन विभाग (कार्या २५), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१८. निवड नस्ती (२ प्रती).

१९. संग्रहार्थ